**मुख्य अभियंता ( विशेष प्रकल्प ), जलसंपदा विभाग, अमरावती या कार्यालयाच्या नियत अस्थायी आस्थापनेवरील पदांना दि. ०१/०३/२०१७ ते ३०/०९/२०१७ पर्यंत मुदतवाढ देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**जलसंपदा विभाग**

**शासन निर्णय क्रमांक- मुदतवाढ -२०१७/( २१६ /२०१७) मोप्र-(२)**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,

दिनांक :- १६/०५/२०१७

**पहावे**- १) शासन निर्णय क्र, जलसंपदा विभाग, क्रमांक- मुदतवाढ -२०१६/( ५४६/ २०१६ ) /मोप्र-(२) , दि. १ /१२ /२०१६

२) मुख्य अभियंता , जलसंपदा विभाग, अमरावती यांचे पत्र.क्र. जसंवि/(विप्र)/आस्था-२/ मुदतवाढ प्रस्ताव/९६/२०१७, दिनांक १० जानेवारी, २०१७

३) वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक पदनि २०१६/प्रक्र.८/१६/आ.पु.क, दिनांक १०/०२/२०१७

**प्रस्तावना :-**

मुख्य अभियंता ( विशेष प्रकल्प, जलसंपदा विभाग, अमरावती या कार्यालयातील आकृतीबंधानुसार नियत अस्थायी आस्थापनेवरील ३० मंजूर पदांपैकी २७ पदांना दिनांक २८/०२/२०१७ पर्यंत चालू ठेवण्यास संदर्भीय क्र.१ च्या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात आली होती. संदर्भ क्रमांक ३ चे वित्त विभागाचे शासन निर्णयान्वये सर्व प्रशासकीय विभागांना त्यांच्या आकृतिबंधात समाविष्ट असलेल्या अस्थायी पदांना तसेच यापूर्वी आढावा मंजूर केल्यावर निर्माण करण्यात आलेल्या परंतु ज्यांचा समावेश आकृतिबंधात करण्यात आलेला नाही अशा अस्तित्वात असलेल्या सर्व अस्थायी पदांना ते दिनांक ३०/०९/२०१७ पर्यंत मुदतवाढ देण्याचे अधिकार देण्यात आले आहेत.

**शासन निर्णय :-**

मुख्य अभियंता ( विशेष प्रकल्प ) जलसंपदा विभाग, अमरावती यांचे संदर्भ क्र. २ अन्वये प्रस्तावित केल्यानुसार आता मुख्य अभियंता ( विशेष प्रकल्प ), जलसंपदा विभाग, अमरावती या कार्यालयातील नियत अस्थायी आस्थापनेवरील ३० पदांपैकी उपलब्ध करुन दिलेल्या २७ पदांना सोबतच्या परिशिष्ट - अ मध्ये दर्शविल्याप्रमाणे दिनांक ०१/०३/२०१७ ते दिनांक ३०/९/२०१७ पर्यंत मुदतवाढ खालील अटींचे अधिन राहून देण्यात येत आहे.

१) उपरोक्त सर्व पदे विभागाने प्रस्तावित केलेल्या कालावधीत कार्यरत असतील.

२) ही पदे आकृतीबंधानुसार मंजूर असतील व सहा महिन्याहून अधिक कालावधीसाठी रिक्त नसतील.

३) उपरोक्त कार्यालयातील खर्च, मागणी क्रमांक आय-५ (नियत अस्थाई आस्थापना), मुख्य लेखाशीर्ष- ४७०१ मोठे व मध्यम पाटबंधाऱ्यावरील भांडवली खर्च,८० सर्वसाधारण, (१९०) सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमांतील गुंतवणूका, (०४) योजनेतर- वेतनावरील खर्चासाठी भाग भांडवली अंशदान , (०४)(०२) विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळास भाग भांडवली अंशदान ( ४७०१ आय १७-१) या लेखाशीर्षाखाली महामंडळास मंजूर असलेल्या नियत अस्थाई आस्थापनेच्या वेतनाखाली मंजूर असलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

४) हे आदेश वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक पदनि २०१६/प्रक्र.८/१६/आ.पु.क, दिनांक १०/०२/२०१७ , अन्वये प्रशासकीय विभागास दिलेल्या प्राधिकारानुसार तसेच आंतरवित्त सल्लागार व सह सचिव यांचे सहमतीने निर्गमित करण्यांत येत आहे.

सदर शासन निर्णय , महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१७०५१६१३३७४६४५२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

Pandurang Tulshiram Kedare

Digitally signed by Pandurang Tulshiram Kedare
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e594e26c6ca4bffd8b1d4e20a155e473c21b0dd40f25c25bd478079005896501, cn=Pandurang Tulshiram Kedare
Date: 2017.05.16 13:42:40 +05'30'

सहपत्र- परिशिष्ट 'अ'

( पां.तु.केदारे )
शासनाचे अवर सचिव

**प्रत- सहपत्रासह-**

१. महालेखापाल २, महाराष्ट्र राज्य, (लेखा व अनुज्ञेयता) नागपूर,
२. महालेखापाल २, महाराष्ट्र राज्य, (लेखापरीक्षा ) नागपूर,
३. वित्त विभाग, व्यय-१२, मंत्रालय, मुंबई,
४. कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ,नागपूर
५. मुख्य अभियंता, विशेष प्रकल्प जलसंपदा विभाग, अमरावती यांना कळविण्यात येते की, प्रस्तुत शासन निर्णयान्वये मंजूरी दिलेल्या अधिकारी / कर्मचारी यांच्या व्यतिरिक्त इतर अधिकारी /कर्मचा-यांची वेतन व देयके अदा केल्यास तसेच या निर्णयान्वये दिलेल्या मंजूरीच्या प्रत्यक्ष/अप्रत्यक्षरित्या चुकीचा अर्थ लावून अन्य अधिकारी/कर्मचारी यांची वेतन देयके अदा केल्यास त्याची संपूर्ण जबाबदारी आहरण व संवितरण अधिकाऱ्यांवर राहील, याची कृपया नोंद घ्यावी.
६. मोप्र-(२) कार्यासन, संग्रहार्थ.

## परिशिष्ट अ

**शासन निर्णय क्र. मुदतवाढ -२०१७/( २१६ /२०१७ ) /मोप्र-(२), दिनाक १६/०५/२०१७ चे सहपत्र**
**नियत अस्थायी आस्थापनेवरील खालील नमूद २७ पदांना**
**दिनांक १/०३/२०१७ ते ३०/०९/२०१७ पर्यंत मुदतवाढ**

| अ.क्र. | पदनाम | आकृतिबंधानुसार मंजूर पदे | मुदतवाढ द्यावयाची पदे |
|---|---|---|---|
| | **तांत्रिक पदे** | | |
| १ | मुख्य अभियंता | १ | १ |
| २ | सहायक मुख्य अभियंता (कार्यकारी अभियंता) | २ | २ |
| ३ | उप अभियंता | ३ | ३ |
| ४ | कनिष्ठ अभियंता | ३ | ३ |
| ५ | मुख्य आरेखक | १ | १ |
| ६ | विशेष अधीक्षक | १ | ० |
| ७ | अधीक्षक | १ | ० |
| ८ | मुख्य दफतर कारकून | १ | १ |
| ९ | प्रथम लिपिक | १ | १ |
| १० | वरिष्ठ लिपिक | २ | २ |
| ११ | कनिष्ठ लिपिक | २ | २ |
| १२ | लघुटंकलेखक | १ | १ |
| १३ | टंकलेखक | ३ | ३ |
| १४ | दूरध्वनीचालक | १ | ० |
| १५ | वाहनचालक | १ | १ |
| १६ | दफतरी | १ | १ |
| १७ | नाईक | १ | १ |
| १८ | शिपाई | ३ | ३ |
| १९ | चौकीदार | १ | १ |
| | **एकूण** | **३०** | **२७** |
| | **एकूण मुदतवाढीची पदे -२७** | | |